अपर जिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने पदस्थापनेबाबत

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

शासन आदेश क्र. बदली-२०२५/प्र.क्र.८७/ई-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २२ एप्रिल, २०२५

**संदर्भ**:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५, दिनांक २५.०५.२००६.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि. १४.०७.२०२१

**शासन आदेश :-**

संदर्भ क्र.१ अन्वये, संदर्भ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ निर्गमित करण्यात आला आहे.

२. तसेच, संदर्भ क्र. २ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या अधिसूचनेमधील नियम क्र.२ (२) (ग) अनुसार अतिरिक्त जिल्हाधिकारी व अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या संवर्गास विभागीय संवर्ग वाटप नियम, २०२१ हे लागू होणार नाहीत, असे स्पष्ट केले आहे.

३. सबब, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार, नियुक्तीच्या प्रतिक्षेतील अपर जिल्हाधिकारी संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची **प्रशासकीय कारणास्तव/विनंतीनुसार** त्यांच्या नावांसमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | कार्यरत पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | **श्री. संजीव सुर्यकांत पलांडे** | **सह आयुक्त (करमणुक कर), कोकण विभाग** | **सह आयुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे या रिक्त पदावर** |

४. उपरोक्त अधिका-यांनी पदस्थापना देण्यात आलेल्या ठिकाणी तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे. संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e1.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

५. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

८. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०४२२१८०५२०२९१९ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2025.04.22 18:06:05 +05'30'

**(महेश वरुडकर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, कोकण/पुणे

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास/गृहनिर्माण) महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण/पुणे
९. मा.अ.मु.स (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
१०. संबंधित अपर जिल्हाधिकारी
११.निवडनस्ती-कार्यासन ई-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.